संसदीय कार्य विभागासाठी ३ दूरचित्रवाणी संच खरेदी करण्यास प्रशासकीय (वित्तिय मान्यता धरुन) मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विमंअ २०१७/प्र.क्र.६४/तीन**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ०४ डिसेंबर, २०१८

**वाचा :-**

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-भांखस-२०१४/प्र.क्र.८२ भाग३/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर २०१६
२) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दिनांक २४ ऑगस्ट २०१७
३) कार्यालयीन आदेश, संसदीय कार्य विभाग, क्रमांक राअभा ६०१८/ प्र.क्र.२/तीन, दिनांक ३ ऑगस्ट २०१८

**प्रस्तावना :-**

या विभागाकडून महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग यांच्या दरम्यान विधानमंडळाच्या अधिवेशनाशी संबंधीत कामकाजाच्या समन्वयाचे काम हाताळण्यात येते. विधानमंडळ अधिवेशनाच्या कामकाजाचे प्रक्षेपण विनाव्यत्यय व सुस्पष्टपणे अवलोकन करण्यासाठी या विभागासाठी ३ दूरचित्रवाणी संच खरेदी करण्याचा प्रस्ताव या विभागाच्या विचाराधीन आहे. संसदीय कार्य विभागास विधानमंडळाच्या अधिवेशनाच्या कामाच्या स्वरुपानुसार दूरचित्रवाणी संचाची गरज विचारात घेऊन विधानभवनातील सचिव, संसदीय कार्य विभाग यांच्या दालनात तसेच विधानसभा व विधानपरिषद सभागृहातील थेट प्रेक्षपण अवलोकन करावयाच्या या विभागाच्या दोन दालनात प्रत्येकी एक अशा एकूण तीन दूरचित्रवाणी संच खरेदीस “विशेष बाब” म्हणून सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ ९१/२०१७/२२ दि. १९/८/२०१७ अन्वये मान्यता दिली आहे. दूरचित्रवाणी संच खरेदी प्रक्रिया पार पाडण्यासाठी शासनाच्या उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भाधिन अनुक्रमांक १ व २ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार केंद्र शासनाच्या गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस या पोर्टलवर या विभागाची खरेदीदार विभाग म्हणून नोंदणी करण्यात आली आहे. तसेच संदर्भाधिन अनुक्रमांक ३ येथील आदेशान्वये विभागासाठी खरेदी अधिकारी तथा वस्तु ताब्यात घेणारा (Consignee) अधिकारी, आहरण व संवितरण अधिकारी व पडताळणी अधिकारी यांची नेमणूक करण्यात आली आहे. अशाप्रकारे उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निश्चित केलेल्या धोरणाच्या अधीन राहून संसदीय कार्य विभागासाठी आवश्यक असलेल्या ३ दूरचित्रवाणी संचाची खरेदी प्रक्रिया पूर्ण करावयाची आहे. त्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेल्या पार्श्वभूमीवर संसदीय कार्य विभागाच्या विधानमंडळ अधिवेशनाच्या कामकाजाशी निगडीत कामाचे स्वरुप विचारात घेता, संसदीय कार्य विभागासाठी ३ दूरचित्रवाणी संच खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षासाठी

उपलब्ध असलेल्या मंजूर निधीच्या मर्यादेत खरेदी करण्यास याव्दारे प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. उक्त खरेदीसाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक - पी - १, मुख्यलेखाशिर्ष २०५२ - सचिवालय - सर्वसाधारण सेवा, ०९० - सचिवालय, (००)(०१) संसदीय कार्य विभाग (अनिवार्य), संकेतांक (२०५२ ०२६८), १३, कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखालील सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र २०१३/ प्र.क्र.३०/ १३ / विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ च्या भाग - पहिला, उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४, नियम क्रमांक २७(२) अन्वये योजनेला किंवा प्रस्तावाला प्रशासकीय (वित्तीय मंजूरी धरुन) मान्यता देण्यास प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०५१५५४३९४२१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Vasudeo Jadhav

Digitally signed by Sanjay Vasudeo Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Parliamentary Affairs, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=46b3ee3c307381324abb3d60d1affb2c15ed046cf0907da3bfbb5f1f0dcd3cfe, serialNumber=bbde2a625f76bd7c322ce4089756d41f788d1ab32918ef26fc2d1560fb85949c, cn=Sanjay Vasudeo Jadhav
Date: 2018.12.05 15:59:59 +05'30'

( सं.वा.जाधव )

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (संसदीय कार्य), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (संसदीय कार्य), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (संसदीय कार्य), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सचिव (संसदीय कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य , (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
६. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरिक्षा)मुंबई / नागपूर
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
९. कक्ष अधिकारी (सर्व कार्यासने), संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती.